सोलापूर जिल्ह्यातील माळशिरस व करमाळा तालुक्यातील ५ इतर जिल्हा मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१६४/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- १२ डिसेंबर, २०१८**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/११९/६८९७/२०१८ दि. २०/१०/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सोलापूर जिल्ह्यातील माळशिरस व करमाळा तालुक्यातील एकूण ५ इतर जिल्हा मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सोलापूर यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, सोलापूर यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सोलापूर यांचा ठराव विचारात घेऊन सोलापूर जिल्ह्यातील खालील रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी (कि.मी.) | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| | **तालुका - माळशिरस** | | | | |
| १. | प्रमुख राज्यमार्ग-१५ पासून दसूर - खळवे - जांबुड - नेवरे रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-६६ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८८ |
| २. | उंबरे (वेळापूर) ते श्रीपूर प्रमुख जिल्हा मार्ग-११८ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ६७ | (०/०० ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१८९ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तालुका - करमाळा** | | | | | |
| ३. | जिल्हाहद्द ते कोंढार - चिंचोली - खातगांव ते पोमलवाडी प्रमुख जिल्हा मार्ग -३ ला जोडणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०१ | (०/०० ते १५/५००) १५.५०० कि.मी. (प्रत्यक्षात १९.१०० कि.मी.) | १९.१०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१९० |
| ४. | बोरगांव ते पाटेगांव - तरटगांव - पाडळी ते घारगांव रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ०४ | (०/०० ते १७/००) १७.०० कि.मी. | १७.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१९१ |
| ५. | मांजरगांव - कोर्टी ते जिल्हा हद्द रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ७८ | (०/०० ते १०/५००) १०.५०० कि.मी. | १०.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१९२ |
| | **एकूण** | | | **६६.६०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील सोलापूर जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **६६.६००** कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (४००४.४७० + ६६.६००) म्हणजेच **४०७१.०७० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **६३.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१३५५.७५० - ६३.००) म्हणजेच **१२९२.७५० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१२१५१६११३३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.12.12 15:20:17 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव(नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,सोलापूर.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सोलापूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.